शालेय मुलांमधील दृष्टीदोष निवारणासाठी त्यांना मोफत चष्मे पुरविण्यासाठी २२३५C४५७ या लेखाशिर्षातून रु.१५०.०० लक्ष वितरीत करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-१३२३/प्र.क्र.१३६/आरोग्य-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ३१ मार्च २०२३.

**वाचा :-**

(१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२, दिनांक ०८.०२.२०२३,दि.१२.०१.२०२३ व दि.१६.०३.२०२३

(२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : बीयुडी-१३२१/प्र.क्र.४०/आरोग्य-७ दि.०८.११.२०२१

(३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : बीयुडी-१३२१/प्र.क्र.४०/२१/आरोग्य-७ दि.३०.०३.२०२२

(४) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. आरबीएसके-३७२०/प्र.क्र.३८/२०२०/ आरोग्य-७ दि.२३.०७.२०२१

(५) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांचे पत्र क्रमांक : राकुकका/आरबीएसके/कक्ष-१५क/नं.क्र.१५क/५८१/विनामुल्य चष्मे/प्रदान११४५६-६०/२३, दिनांक २७.०२.२०२३

**प्रस्तावना:-**

राज्यातील सर्व शासकीय व अनुदानीत शाळांमधील ६ ते १८ वर्ष वयोगटातील मुलांमधील दृष्टीदोष निवारणासाठी त्या मुलांची नेत्र तपासणी करुन दृष्टीदोषाचे वेळीच निदान करुन त्यांना योग्य ते चष्मे मोफत उपलब्ध करुन दिल्यास त्यांच्या शालेय गतिविधींमध्ये कोणतीही बाधा येणार नाही. त्या दृष्टीने राज्यातील शासकीय व निमशासकीय८१,५५६ शाळांमधील विद्यार्थ्यांची नेत्र तपासणी करुन शास्त्रीय पध्दतीने प्रमाणित केल्यानुसार त्यांना आवश्यकतेनुसार मोफत चष्मे पुरविण्याचा निर्णय शासनाने घेतला असून सदर कार्यक्रम हा राज्य शासनाची नवी योजना म्हणून राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर योजना राबविण्यासाठी सन २०२२-२३ या आर्थीक वर्षात रु.५००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता. तथापि, सुधारीत अंदाजानुसार रु.१५०.०० लक्ष निधी मंजूर करण्यात आलेला आहे. सदर निधी राष्ट्रीय बाल स्वास्थ कार्यक्रमास उपलब्ध करुन देण्यासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील सर्व शासकीय व अनुदानीत शाळांमधील ६ ते १८ वर्ष वयोगटातील मुलांमधील दृष्टिदोष निवारणासाठी राष्ट्रीय बाल स्वास्थ कार्यक्रमांतर्गत सर्वसाधारण वर्गवारीतून सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात लेखाशिर्ष २२३५C४५७ मधून रु.१५०.००लक्ष इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदान वितरणासाठी संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये मुख्य प्रशासकीय अधिकारी (कुटुंब कल्याण, माता बालसंगोपण व शालेय आरोग्य), पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (कुटुंब कल्याण, माता बालसंगोपण व शालेय आरोग्य), पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात आले आहे. त्यामुळे आहरण व संवितरण अधिकारी यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम नियमाप्रमाणे महाव्यवस्थापक, हाफकीन महामंडळ मर्यादित मुंबई यांच्याकडे वर्ग करावी.

३. सदर प्रस्तावावरील खर्च खालील प्रमाणे नमुद लेशाशिर्षाखली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२२-२३ साठी मंजूर करण्यात आलेल्या उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

(रुपये लाखात)

| अ.क्र. | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पिय तरतुद २०२२-२३ | सुधारीत अंदाजानुसार उपलब्ध झालेली तरतुद | मागणी रक्कम (राज्य हिस्सा) |
|---|---|---|---|---|
| १ | आर-१<br>२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण<br>०२, समाज कल्याण<br>१०२, बाल कल्याण<br>(०२) शालेय विद्यार्थ्यांची आरोग्य तपासणी<br>(०२)(०१) शालेय विद्यार्थ्यांना दृष्टीदोष निवारणार्थ मोफत चष्मे पुरविणे<br>(राज्य योजना)(कार्यक्रम)<br>३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)<br>लेखाशिर्ष (२२३५C४५७) | ५००.०० | १५०.०० | १५०.०० |

४. वित्त विभागाच्या दिनांक ४ एप्रिल, २०२२ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक ४ एप्रिल,

२०२२ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/ विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

५. सदर अनुदान सशर्त असून यापुर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

६. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ८०/१४७२ दिनांक २८.०३.२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १८७/व्यय-१३, दिनांक ३०.०३.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३०१२१६१७६२१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2023.03.31 22:01:51 +05'30'

**(राजेंद्र वि. कुडले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.

२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, कुटुंब कल्याण कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. नियोजन विभाग(का-१४७२), मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग ( अर्थसंकल्प)/व्यय-१३, मंत्रालय, मुंबई.
११.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१२.निवडनस्ती ( आरोग्य -७) .